**मौजे तळमोड ता. उमरगा जि. उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२०१२/प्र.क्र.३७५/पापु-१८.

नवीन प्रशासन भवन

मंत्रालय, मंबई ४०० ०३२

दिनांक: २७ ऑगस्ट, २०१४.

वाचा

१. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापापु-१००५/प्र.क्र.८५/ पापु-०७ दिनांक ९ मे,२००५..

२. शासन निर्णय क्र. ग्रापापु-१००७/प्र.क्र.२४३/पापु-०७/ दिनांक ४ फेब्रुवारी,२००९

प्रस्तावना

मौजे. तळमोड ता. उमरगा जि. उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या कामास केंद्र पुरस्कृत वर्धित वेग कार्यक्रमा अंतर्गत रु. ५७,०१,७००/- रक्कमेच्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास दिनांक २६.०१.२००८ रोजी ग्रामपंचायत तळमोड यांनी प्रशासकीय मान्यता दिली होती. तथापि काही अपरिहार्य कारणामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. सदर वाढ ही मुळ अंदाजपत्रकीय किंमतीच्या १५% पेक्षा जास्त असल्यामुळे संदर्भाधिन शा.नि.क्र.२ नुसार मुख्य कार्यकारी अधिकारी जि.प.उस्मानाबाद यांनी सदर प्रस्ताव या विभागाकडे सादर केला होता. त्याप्रमाणे मौजे. तळमोड ता. उमरगा जि. उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेचा सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय

उपरोक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने मौजे. तळमोड ता. उमरगा जि. उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या रु. ७१.७९ ( एकात्तर लाख एकोणऐंशी हजार फक्त ) किंमतीच्या सुधारीत अंदाजपत्रकास व आराखडयास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून केंद्र पुरस्कृत वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत करावयाच्या तरतुदीचा तपशिल या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रात दर्शविण्यात आला आहे.

२. ही योजना जिल्हापरिषद उस्मानाबाद मार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

३. ही योजना मौ.तळमोड गावाची असल्याने ती सर्व कामे पुर्ण करुन सबंधित ग्रामपंचायतीस या वित्तीय वर्षात हस्तांतरीत करण्यावी यावी.

४. ही योजना राबविणे, त्यांचे परिरक्षण दुरुस्त्या ( विशेष दुरुस्त्या धरुन ) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवीकरण निधीसाठी किंवा

योजनेच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम १९६० मधील तरतुदीनुसार आकारता येणा-या पाणी पट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल असे बघण्याची जबाबदारी सबंधीत ग्रामपंचायतीची/जिल्हापरिषदेची राहील. त्यानुसार या योजनेसाठी पाणीपट्टीचा दर आकारण्यात यावा. याप्रमाणे दर आकारणी करुनही योजना आर्थिकदृष्टया स्वयंपुर्ण झाली नाही. तर देखभाल दुरुस्तीचा जादा खर्च ग्रामपंचायतीस/जिल्हापरिषदेस त्यांच्या इतर उत्पन्नातून भागवावा लागेल. तसेच सदर योजनेच्या कामाचा पुर्णत्वाचा दाखला त्वरीत सादर करण्यात यावा.

६. या योजनेवर होणारा वाढीव खर्च मागणी के.वाय-२,२२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणी पुरवठ-१०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने (०२ ) (०१) ( डब्ल्युएस-६ )

( राज्यक्षेत्र ) पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती/जिल्हा परिषद यांना अनुदाने ( २२१५ ) (१२१७ ) ४१ सहायक अनुदाने या अर्थसंकल्पीय शिर्षाच्या खाती टाकावा व त्याखालील उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागवावा.

८. हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौ-संदर्भ क्र.३५२/१४४३ दिनांक ०६.०१.२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३५०/व्यय-३, दिनांक २४.०७.२०१४ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४०८२७१७३७३७९६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DESHMUKH DILIP P

Digitally signed by DESHMUKH DILIP P
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=DESHMUKH DILIP P
Date: 2014.08.27 17:33:50 +05'30'

**( दि. प्र. देशमुख )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:**

१. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
२. मा. राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
३. सर्व मा. विधान सभा/विधान परिषद सदस्य.
४. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.

५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, उस्मानाबाद.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद.
८. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, औरंगाबाद.
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
१२. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ना.व.ग्रा.मंडळ, औरंगाबाद.
१३. कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकाण, ना.व.ग्रा.योजना मंडळ, उस्मानाबाद
१४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हापरिषद, औरंगाबाद.
१५. महालेखापाल -१, ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई.
१६. महालेखापाल-२, (लेखापरिक्षा- व लेखाअनुज्ञेयता ), नागपूर.
१७. प्रधान सचिव, (पा.पु. व स्व.वि.), मंत्रालय, मुंबई.
१८. मुख्य अभियंता, तथा वि. का. अ., (पा.पु. व स्व.वि.), मंत्रालय, मुंबई.
१९. पाणी पुरवठा विभाग कार्यासन ०४,०५,०६,०९,१३,१७ मंत्रालय, मुंबई.
२०. निवड नस्ती.

**सहपत्र**

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, पापुयो-२०१२/प्र.क्र.३५१/पापु-१८
दिनांक २७ ऑगस्ट,२०१४.

| योजनेचे नांव | योजनेची मुळ किंमत | योजनेची सुधारीत किंमत | एकुण |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| तळमोड ता.उमरगा जि. उस्मानाबाद | ५७.०२ लक्ष. | ७१.७९ लक्ष | ७१.७९ लक्ष ( रु. १४.७७ लक्ष वाढीव खर्च) |

DESHMUKH DILIP P

Digitally signed by DESHMUKH DILIP P
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=DESHMUKH DILIP P
Date: 2014.08.27 17:34:23 +05'30'

**( दि. प्र. देशमुख )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.